पारिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत. कै.श्री.संदीप गायकवाड, शिपाई

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन आदेश क्र.मबाआ-२०२०/प्र.क्र.४२/का-७**

३ रा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०५ मे, २०२२

**वाचा:-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि. २९.०९.२०१८.

२) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/आस्था/पअंनियो/२०१९-२०/का-१/१९५४,दि.१५.६.२०२० रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.

३) कर्मचाऱ्याचे नाव कै.संदीप श्रावण गायकवाड यांचे नामनिर्देशित व्यक्ती श्रीम.संगिता संदीप गायकवाड यांचा परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरिता प्राप्त झालेला दि.३.१०.२०१८ रोजीचा अर्ज.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.१०.२.२०२१

**आदेश**

उपरोक्त वाचा क्रमांक २ अन्वये आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीम.संगिता संदीप गायकवाड यांच्या वाचा क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४ दि.२९ सप्टेंबर,२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, कै.संदीप श्रावण गायकवाड यांनी नामनिर्देशित व्यक्तीस म्हणजे त्यांच्या पत्नी श्रीम.संगिता संदीप गायकवाड यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/(अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करण्यात आहे. तथापि, कै.संदीप श्रावण गायकवाड यांच्याकडून शासनास रु. १,६३,३९२/- (रु. एक लाख त्रेसष्ट हजार तीनशे ब्याण्णव फक्त) इतकी रक्कम येणे बाकी आहे. सदर रक्कम ही श्रीम.संगिता संदीप गायकवाड यांना देण्यात येणाऱ्या सानुग्रह अनुदान रक्कमेमधून वळती करुन घेण्यात यावी व उर्वरीत रक्कम रु. ८,३६,६०८/- (आठ लाख छत्तीस हजार सहाशे आठ फक्त) त्यांना अदा करण्यात यावी.

सदर “सानुग्रह अनुदान” शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि. १.११.२०१४ रोजी मृत्यु पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च "मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी,१०३, अनुकंपा भत्ते, (००) (०६)- परिभाषित अशंदान / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

सदरचा शासन आदेश वरील वाचा क्र १.येथील शासन निर्णयातील अ.क्र.५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०५०५१७०३००३१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
Date: 2022.05.10 15:13:51 +05'30'

**( वि.रा.ठाकूर )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१ आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
२ विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास,कोकण विभाग
३ संबंधित अधिदान व लेखा अधिकारी /कोषागार अधिकारी
४ जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,मुंबई उपनगर यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव.
५ श्रीम.संगिता संदीप गायकवाड,अनीशा कुटीर,रु.नं.४०१, ४ था माळा,फ्लॉट नं.६२,दत्त मंदिर रोड, वाशी गांव, नवी मुंबई
६ निवड नस्ती कार्यासन-७